सन २०१६-१७ करिता जागतिक कृषि गणना योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत..

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः कृगयो -२०१६/प्र.क्र.१६७/११-अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.
तारीख: २९ मार्च, २०१७

वाचा -

१) शासन निर्णय: कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य-२०१६/प्र.क्र.५/११-अे, दि.२०.१०.२०१६
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ -३, दि.२०.४.२०१६
३) शासन निर्णय: कृषि व पदुम विभाग क्र. कृगयो-२०१६/प्र.क्र.१६७ /११-अे, दि.२१.११.२०१६
४) शासन निर्णय: कृषि व पदुम विभाग क्र. कृगयो-२०१६/प्र.क्र.१६७/११-अे, दि.०३.०१.२०१७
५) शासन निर्णय: कृषि व पदुम विभाग क्र. पदसातत्य-२०१६/प्र.क्र.५/११-अे, दि.२२.०२.२०१७
६) शासन निर्णय: कृषि व पदुम विभाग क्र.कृगयो-२०१६/प्र.क्र.१६७/११-अे, दि.२८.०२.२०१७
७) भारत सरकार, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग यांचे पत्र क्र.११०१४-१/२०१६-ACU, दि.२३.०३.२०१७
८) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृषि गणना/अनुदान/बीडीएस/प्र.क्र.८४/१११/१७,दि. २४.०३.२०१७

प्रस्तावना :-

जागतिक कृषि गणना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेकरीता केंद्र शासनाने राज्यासाठी अद्यापपर्यंत एकुण रु. ११८.४८ लाख इतकी रक्कम उपलब्ध करुन दिलेली असून त्यापैकी राज्य शासनाने यापूर्वी लेखानुदानातून उपलब्ध करुन दिलेली रक्कम समायोजित करुन उर्वरीत रक्कम यापूर्वीच वितरीत करण्यात आली आहे. आता कृषि आयुक्तालयाने जागतिक कृषि गणना योजनेकरिता केंद्र शासनाकडून उपलब्ध झालेली पाचव्या हप्त्याची रु १५.००.लाख इतकी रक्कम मासिक निधी वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्याची विनंती केली असून सदर रु.१५.०० लाख इतकी रक्कम वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

जागतिक कृषि गणना या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेकरीता केंद्र शासनाने पाचव्या हप्त्यासाठी उपलब्ध करुन दिलेली रु.१५.०० लाख इतकी रक्कम सन २०१६-१७ या वर्षासाठी वापरण्यास या आदेशान्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत खर्च खालील लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ करिता मंजूर केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा -

**"मागणी क्रमांक डी-३, २४०१, पीक संवर्धन,**
**(००) (१११) कृषि अर्थशास्त्र व सांख्यिकी**
**(००) (१०) जागतिक कृषि गणना,**
**(१०० टक्के केंद्र पुरस्कृत) (२४०१ ०९९६)"**
**बाब - ५० -इतर खर्च**

३. प्रस्तुत प्रयोजनार्थ संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- ५ यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच आयुक्त (कृषि) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा निधी वितरीत करणेबाबत प्रस्तुत आदेश वित्त विभागाच्या उपरोक्त दि.२०.०४.२०१६ च्या परिपत्रकानुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३०१४५१०१२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sharad Balkrishna Pawaskar

Digitally signed by Sharad Balkrishna Pawaskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sharad Balkrishna Pawaskar
Date: 2017.03.30 14:53:50 +05'30'

**(श. बा. पावसकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
२) उप-आयुक्त (कृषि गणना), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
३) सहाय्यक संचालक (लेखा-१), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
४) सहाय्यक संचालक (अर्थसंकल्प), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-५
५) महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
६) संचालक, लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
८) वित्त विभाग (व्यय-१) / (अर्थसंकल्प-१३) / (अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
९) नियोजन विभाग (कार्यासन-१४३१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१०) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-०३२
११) उपसचिव (११-अे / २-अे) यांचे स्वीय सहाय्यक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-०३२
१२) कक्ष अधिकारी (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१३) निवड नस्ती, का - ११-अे